**श्री. स्वामी जगद्गुरू शंकराचार्य पीठ करवीर, कोल्हापूर या पीठास वाढीव मोबदला देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय, क्रमांक:- बैठक- ३८१६/प्र.क्र.८५/ज-५अ
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावना :-**

श्री स्वामी जगद्गुरू शंकराचार्य पीठ करवीर, कोल्हापूर ही संस्था विश्वस्त न्यास म्हणून नोंदणीकृत झालेली संस्था असून सदर संस्थेचा पब्लिक सोल ट्रस्ट नं. ए-१३९१ असा आहे. सदर पीठास उत्पन्नाचे साधन असावे म्हणून तत्कालीन क्षत्रिय कुलावंतास श्री राजे शंभु छत्रपती यांनी सन १८४८ मध्ये सदर पीठास केसापूर पेठ सनदेव्दारे बहाल केलेली होती. त्यानंतर काही कालांतराने म्हणजे सन १८७३ मध्ये कोल्हापूर नगर पालिका स्थापन झाली. कोल्हापूर नगर पालिकेस उत्पन्नाचे साधन मिळावे व नगर पालिकेचे उत्पन्न वाढावे म्हणून त्यावेळच्या मुंबई सरकारने ठराव करून सदरहू जमीन करवीर पीठाकडून काढून कोल्हपूर नगर पालिकेस दिली. त्यावेळी सदर जमिनीची एकरकमी किंमत न देता सदरच्या जमिनीच्या मोबदल्यापोटी प्रतीवर्षी एकशे शहाऐंशी रुपये आकरा आणे चार पै म्हणजे रू. १८६.७० करवीर तालुका ट्रेझरीमधून करवीर पिठास देण्यात यावे असे मुंबई सरकारने ठराव क्र. ५०४० दि. १२/०८/१८७३ अन्वये ठरविले होते. त्यानुसार सन १८७३ पासून करवीर तालुका ट्रेझरी मधून करवीर पीठास सन २००० पर्यंत प्रतीवर्षी रू. १८६.७० पै. इतकी रक्कम देण्यात आलेली आहे. सन २००० नंतर श्री. स्वामी जगद्गुरू शंकराचार्य पीठ करवीर, कोल्हापूर यांनी सदरची रक्कम स्विकारलेली नाही कारण सन १८७४ साली ठरविण्यात आलेल्या रू. १८६.७० पै. या वार्षिक रकमेचे चलन वाढीमुळे मुल्य नगण्य झालेले असल्याने त्यांना मोबदल्यापोटी दरवर्षी शासनाकडून देण्यात येणारी रक्कम वाढवून मिळावी अशी सदर पीठाची मागणी होती.

त्यानुषंगाने श्री स्वामी जगद्गुरू शंकराचार्य पीठ करवीर, कोल्हापूर या पीठास तत्कालीन मुंबई सरकार यांच्या सन १८७३ च्या आदेशान्वये मंजूर रुपये १८६.७० मात्र या वार्षिक मोबदल्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात मा. मंत्रिपरिषदेने दिनांक २५/१०/२०१६ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार शासन खालीलप्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

श्री स्वामी जगद्‌गुरू शंकराचार्य पीठ करवीर, कोल्हापूर या पीठास तत्कालीन मुंबई सरकारच्या सन १८७३ च्या आदेशान्वये मंजूर रु. १८६.७० च्या वार्षीक मोबदल्यात पुढीलप्रमाणे वाढ करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

i. सदर पीठास दिनांक ०१.०४.२००१ पासून ३१ मार्च, २०११ पर्यंत रुपये ३७,०००/- या प्रमाणे वार्षिक मोबदला देण्यात यावा.

ii. दिनांक ०१.०४.२०११ पासून सदर पीठास रुपये २,१५,०००/- या प्रमाणे वार्षिक मोबदला देण्यात यावा.

iii. सदरची रक्कम उक्त पीठास दरवर्षी अदा करण्यासाठी महसूल व वन विभागाकडे एक नवीन लेखाशिर्ष उघडून त्याखाली दरवर्षी देय ठरणाऱ्या रक्कमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्यात यावी.

iv. सदर प्रकरणी शासनाने घेतलेला निर्णय हा अन्य प्रकरणांसाठी पूर्वोदाहरण समजता येणार नाही.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २१६/२०१६/व्यय-९, दिनांक १९.०७.२०१६ च्या अनुषंगाने व विधी व न्याय विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४१३/५४०/Civil/Confl./A-Br, दिनांक ०१.०९.२०१६ अन्वये झालेल्या विचारविनियमानुसार व मंत्रिपरिषदेच्या दिनांक २५.१०.२०१६ च्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११०१५०१४९८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Nanasaheb R Dhane

Digitally signed by Nanasaheb R Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nanasaheb R Dhane
Date: 2016.12.27 13:42:33 +05'30'

( ना. रा. ढाणे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (महसूल) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
विभागीय आयुक्त, पुणे,
जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर,
सचिव, श्री स्वामी जगदगुरू शंकराचार्य पीठ करवीर, २२९९,डी वॉर्ड, शुक्रवार पेठ,कोल्हापूर
जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
वित्त विभाग (अर्थसंकल्प-६/ व्यय-९), मंत्रालय, मुंबई ३२.
महालेखापाल - १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
निवड नस्ती / कार्यासन ज-५अ, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२